आम आदमी विमा योजनेतंर्गत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत निधी वितरीत करणेबाबत...
(लेखाशिर्ष २२३५ सी१८१)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र.१५८/ कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २९ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष विभाग क्र.विसयो २०१०/प्र.क्र.१७५/ विसयो-२, दि.२६.१०.२०१०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पुरक-२०१८ /प्र.क्र.९५ / अर्थ-३, दि.२७.०७.२०१८
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाची नस्ती क्र.विसयो-२०१८/प्र.क्र.११७/विसयो

**शासन निर्णय-**

आम आदमी विमा योजनेतंर्गत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जुलै,२०१८ च्या विधानमंडळ अधिवेशनात मागणी क्र. टी-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजनांतर्गत योजना, (०२)(०१) आम आदमी विमा योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१८१), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षांखाली रु.५०७.०० लाख इतका निधी पुरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाने सदर निधीपैकी ७० % मर्यादेत निधी वितरीत करण्यास संदर्भीत शासन परीपत्रक,वित्त विभाग दि.०२/०४/२०१८ व दि.२७/०४/२०१८ मध्ये नमूद अटींच्या अधिन राहुन मान्यता दिलेली आहे.

यानुषंगाने सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाने वाचा क्र.४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता आम आदमी विमा योजनेसाठी लेखाशिर्ष (२२३५ सी१८१) ५०-इतर खर्च या लेखाशिर्षांखाली रु. ३५४.९० लाख (अक्षरी रुपये तीन कोटी चौपन्न लाख नव्वद हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख व नियंत्रण अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.२ व ३ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.७५/अर्थ१९, दि.१४/०८/२०१८अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२९११३२०५२०२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.09.29 15:47:39 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.